**आदिवासी क्षेत्र उपयोजना योजनेत्तर आणि योजनांतर्गत योजनांसाठी वित्त विभागाने उपलब्ध करून दिलेल्या उर्वरित निधीच्या वितरणास व खर्चास मान्यता देणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१७ / प्र.क्र. १३४ / कार्यासन. ६

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ०९ फेब्रुवारी , २०१७.

**वाचा -**

१) वि. वि,शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.०४.२०१६.
२) आ.वि.वि.शासन ज्ञापन क्र.बीयुडी-२०१६ /प्र. क्र.०१ /का.०६, दि.०९-०५-२०१६.
३) आ.वि.वि.शासन ज्ञापन क्र.बीयुडी-२०१६ /प्र. क्र.०८ /का.०६, दि.०९-०५-२०१६.
४) वि. वि,शासन परिपत्रक क्र.संकीर्ण- २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५,दि.१०.५.२०१६.
५) वि.वि,शासन परिपत्रक क्र. पुरक-२०१६ /प्र.क्र. १२८ /अर्थ-३, दि.१२.०८.२०१६
६) वि.वि,शासन परिपत्रक क्र. पुरक-२०१६ /प्र.क्र. २०१ /अर्थ-३, दि. ०४.०१.२०१७
७) वि.वि.शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.०७/ कोषा-प्र-५, दि.१७.०१.२०१७
८) वि.वि,शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३,दि.०८.०२.२०१७

**प्रस्तावना :**

उक्त नमूद वाचा येथील क्र. ८ नुसार वित्त विभागाने योजनेत्तर योजनांकरीता एकुण अर्थसंकल्पित तरतूदीच्या ९०% च्या प्रमाणात निधी वितरीत केला आहे. तसेच उर्वरीत तिमाही करीता ०१-वेतन, ०२-मजुरी, ०४-निवृत्तीवेतन खर्च, ०६-दूरध्वनी खर्च, २२-शस्त्रे व दारुगोळा, ३३-अर्थसहाय्य, ३६-सहाय्यक अनुदाने(वेतने), ४५-व्याज, ५५-कर्जे व आगाऊ रकमा, व ५६-कर्जाची परतफेड यासाठीच्या उर्वरीत २०% तरतूदी योजनेत्तर व योजनांतर्गत योजनांकरीता १००% वितरणास मान्यता दिली आहे. त्यानुषंगाने योजनेत्तर योजनांचा व मागासवर्गिय कल्याण उपशिर्षांतर्गत योजनांचा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय-**

१. आदिवासी विकास विभागांतर्गतच्या योजनेत्तर योजनांसाठीच्या वाचा क्र. २ च्या विवरणपत्रातील स्तंभ ४ नुसार अर्थसंकल्पित तरतूदीतील ८०% तरतूदी विभागाकडून यापूर्वीच वितरीत करण्यात आल्या. आहे. सदर अर्थसंकल्पित तरतूदींपैकी उर्वरीत १०% तरतूद वितरीत करण्यात येत आहे.

२. त्याचबरोबर योजनेत्तर योजनांच्या ०१-वेतन, ०२-मजुरी, ०४-निवृत्तीवेतन खर्च, ०६-दूरध्वनी खर्च, २२-शस्त्रे व दारुगोळा, ३३-अर्थसहाय्य, ३६ -सहाय्यक अनुदाने(वेतने), ४५-व्याज, ५५-कर्जे व आगाऊ रकमा, व ५६-कर्जाची परतफेड या उदिष्टाखालील तरतूदी, अर्थसंकल्पित तरतूदींच्या १००% प्रमाणात वितरीत करण्यात येत आहेत.

३. त्याचप्रमाणे वाचा क्र. ३ येथील शासन ज्ञापनान्वये वितरीत केलेल्या योजनांतर्गत योजनांमधील उपरोक्त २ मधील उदिष्टांकरिता सुध्दा अर्थसंकल्पित तरतूदींच्या १००% प्रमाणात निधी वितरीत करण्यात येत आहेत.

४. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या सूचना व वाचा येथील क्रमांक १, ७, व ८ मधील अटी व शर्तींचे पालन करावे.

५. सदर शासनादेश वि.वि,शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.०८.०२.२०१७ अन्वये विभागास प्राप्त झालेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र २०१७०२०६१६००१८४०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Maruti Sawant
Date: 2017.02.09 12:04:33 +05'30'

**भगवान सावंत**
शासनाचे अवर सचिव

प्रत,

१. संबंधित सर्व प्रशासकीय विभाग,मंत्रालय,मुंबई
२.आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/नागपूर/ठाणे/अमरावती.
४.विभागीय आयुक्त, मुंबई/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती/पुणे.
५.सर्व जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती,
६.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद

७.सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
८.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
९.महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.(प्रत्येकी ३ प्रती)
१०.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, ५ वा माळा, मुंबई.
११. अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२. सर्व कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
१३. निवड नस्ती, आदिवासी विकास विभाग (कार्या-०६).